**सन २०१९-२० या वित्तीय वर्षासाठी महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ, मुंबई यांना सहाय्यक अनुदान वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- लविम-२०१९/प्र.क्र.१५८/उद्योग-६.**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १२ डिसेंबर, २०१९.

<u>वाचा</u> : १) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/२०१९-२०/(प्र.क्र.३५)/प्रशासन-१, दि.१७/०७/२०१९.
२) महाव्यवस्थापक, महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ यांचे क्रमांक-मलउविम/शासन/हस्तकला/२०१९-२०/११६१, दिनांक ३.१२.२०१९

**शासन निर्णय:-**

सन २०१९-२० या वित्तीय वर्षाकरीता हस्तकला उद्योग या प्रधान लेखाशीर्षाखाली ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) या उद्दिष्टांसाठी रु.९४०.०० लाख (नऊ कोटी चाळीस लाख फक्त/-) इतके अनुदान अर्थसंकल्पीत करण्यात आलेले आहे. त्यापैकी उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या संदर्भ क्र. १ च्या परिपत्रकान्वये ६० टक्केच्या मर्यादेत रूपये ५६४.०० लक्ष (पाच कोटी चौसष्ट लाख फक्त/-)इतके अनुदान नियंत्रक अधिकाऱ्यांना उपलब्ध करून देण्यात आलेले आहे.

२. महाव्यवस्थापक, महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ,मुंबई यांना त्यांच्या संदर्भ क्र. २ च्या पत्राच्या अनुषंगाने सन २०१९-२० या आर्थिक वर्षाच्या कालावधीतील खर्च भागविण्यासाठी रूपये ५६४.०० लाख (पाच कोटी चौसष्ट लाख फक्त/-) इतके सहायक अनुदान वितरीत करण्यास या शासननिर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. सदर अनुदान अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर दर्शविल्याप्रमाणे खर्च करण्यात यावे.

३. यावरील खर्च मागणी क्रमांक के-७, "२८५१- ग्रामोद्योग व लघुउद्योग, १०४ हस्तव्यवसाय उद्योग, (००) (०२) हस्तव्यवसाय उद्योगाचा विकास (कार्यक्रम) (२८५१०५६७) ३१-सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर)" या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० या अर्थसंकल्पीय वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व तो त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर रक्कमेच्या आहरण व संवितरणाचे अधिकार विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील लेखा अधिकारी यांना देण्यात आलेले आहेत. सदर अनुदान खर्च झाल्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र महामंडळाने शासनास व आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना विहित कालावधीत सादर करावे. तसेच लेख्यांच्या खर्चमेळाबाबत महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई यांच्याकडून विचारणा करण्यात येईल, तेव्हा लेख्यासंबंधीची आवश्यक ती कागदपत्रे महामंडळाने महालेखापाल कार्यालयास सादर करावीत.

५. सदर शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/विनियम, दि.१७ एप्रिल,२०१५ मधील भाग-१, उपविभाग-१ मधील अनुक्रमांक २७ नियम क्रमांक १४९ अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१२१२११३३३२८१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kavita Vijay Pawar

Digitally signed by Kavita Vijay Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries, Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a3b87786359abd7b3f135e9849f2f0e3f2ca97e8ca2dd67ad836635a3aa0ea9, serialNumber=6f8674619c7f615d9eeac52c9289956e27601f17938f0e253b14bde8e35e822e, cn=Kavita Vijay Pawar
Date: 2019.12.12 12:37:12 +05'30'

**( कविता पवार )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति :- माहितीसाठी व आवश्यक त्या उचित कार्यवाहीसाठी अग्रेषित :

१. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई .
२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ, मुंबई.
३. वित्त नियंत्रक, महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. वरिष्ठ उप महालेखापाल (पडताळणी) बाह्य लेखा परीक्षा विभाग, मुंबई.
९. लेखा अधिकारी, उद्योग संचालनालय, नवीन प्रशासन भवन, मुंबई. (५ प्रती)
१०. कार्यासन अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१६/अर्थसंकल्प-१४/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई-३२.
११. कार्यासन अधिकारी (प्रशासन-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती (उद्योग-६).